**डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (DILRMP) अंतर्गत भूमापन नकाशांचे डिजिटायझेशन करण्याचे काम खाजगी संस्थांना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ २०१६ /प्र.क्र. ९९/ ल-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०१७

<u>वाचा-</u>

१. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:संकीर्ण १०११/२१०३/प्र.क्र.६१८/ल-१, दि. ६/१०/२०१५.
२. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. १७/९/२०१६ रोजी झालेल्या १०४ थ्या बैठकीचे इतिवृत्त.
३. शासन आदेश महसूल व वन विभाग शासन क्रमांक:राभूआ-२०१६/१२९९/प्र.क्र.३३६/ ल- १, दि. २४/११/२०१६.
४. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे यांचेकडील पत्र क्र. पु.मो.१/ प्र.क्र. ९४/२०१७, दि. १६/१/२०१७.
५. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. २७/१/२०१७ रोजी झालेल्या १०९ व्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना:</u>**

उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (सध्या डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम) याअतंर्गत राबविण्यात येत असलेल्या “ई-नकाशा” प्रकल्पातंर्गत राज्यातील भूमि अभिलेख विभागाकडील सर्व भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

त्याअनुषंगाने पहिल्या टप्प्यात पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर व रायगड या ६ जिल्ह्यातील १३ प्रकारच्या भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन करण्यासाठी तयार केलेल्या निविदेस (RFP) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने दि. १७/९/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार नकाशांचे डिजीटायझेशन करण्यासाठी दि. १८/१०/२०१६ रोजी ई-टेंडरिंग पद्धतीने निविदा प्रसिद्ध करण्यात आल्या. सदरची निविदा प्रक्रिया दि. ७/१/२०१७ अखेर पुर्ण करण्यात आली आहे.

भूमापन नकाशांच्या डिजीटायझेशनचे काम करण्यासाठी प्राप्त झालेले दर व कामाच्या वाटपा संदर्भात निविदेत विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार डिजिटायझेशनच्या कामाचे वाटप पात्र निविदाधारकानां करण्याचा प्रस्ताव जमाबंदी आयुक्तांकडून शासनास सादर करण्यात आला असून त्यानुसार निवड करावयाच्या अभिकर्त्यांच्या नावास दि. २७/१/२०१७ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आलेली आहे. उच्चाधिकार समितीच्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय-**

१) पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपुर या ६ जिल्हयांतील खालील १३ प्रकारच्या भूमापन नकाशांच्या डिजीटायझेशनचे काम करण्यासाठी होणा-या अंदाजे रु. ३५.७२ कोटी (रु. पस्तीस कोटी बहात्तर लाख फक्त) खर्चास या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. टिपण
२. काटेफाळणी / फोडी टिपण
३. फाळणी नकाशा / पोटहिस्सा नकाशा / गट प्लॉट नकाशा
४. फेअर स्केच
५. कोर्ट वाटप नकाशा
६. सविस्तर भूमापन मोजणी नकाशा
७. गटबुक नकाशा
८. ट्रँग्युलेशन नकाशा
९. सर्व्हे नंबरचे कापडी नकाशे
१०.नगर भूमापन नकाशा
११.भूमिसंपादन नकाशा
१२.बिनशेती नकाशा
१३.इतर (बंदोबस्त नकाशे, सर नकाशे, सर्व्हे नंबरचेमूळ नकाशे इ.)

२) पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपुर या ६ जिल्हयांतील उक्त भूमापन नकाशांचे डिजीटायझेशनचे काम खालील तक्त्यामधील जिल्ह्यासमोर नमुद केलेल्या अभिकर्त्याकडून त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दरानुसार करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | एकुण पॉलीगॉनची संख्या | खाजगी संस्थेचे नाव | प्रति पॉलीगॉन दर (रुपये) | अंदाजित एकुण खर्च (रू. कोटीमध्ये) |
|---|---|---|---|---|---|
| १. | पुणे | ४१,९२,०९५ | आय.एल. & एफ.एस. एनव्हायरमेंटल एनफ्रास्ट्रक्चर & सर्व्हीसेस लि. | २४.७५ | १०.३८ |
| २. | रायगड | ४०,४१,३६६ | आय.एल. & एफ.एस. एनव्हायरमेंटल एनफ्रास्ट्रक्चर & सर्व्हीसेस लि. | २४.७५ | १०.०० |
| ३. | नाशिक | १८,६६,६५८ | आय.आय.सी. टेक्नॉलॉजीस लि. | २७.७५ | ५.१८ |
| ४. | औरंगाबाद | १०,९८,१४० | आय.आय.सी. टेक्नॉलॉजीस लि. | २९.५० | ३.२४ |
| ५. | अमरावती | १०,६१,३७२ | रामटेक स्वॉफ्टवेअर सोल्यूशन्स प्रा.लि. | २९.५० | ३.१३ |
| ६. | नागपूर | १३,८०,५५० | ए डी सी सी इन्फोकॅड लि. | २७.५० | ३.८० |
| | एकुण | **१,३६,४०,१८१** | | | **३५.७२** |

३) "टिपण" या प्रकारच्या नकाशांचे डिजीटायझेशन करण्याकरिता होणारा खर्च, डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमातंर्गत १००% केंद्र शासन पुरस्कृत योजना (०२) (०३) भूमि अभिलेख खर्च राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) संचालक, भूमि अभिलेख (२०२९०८०५) (१०० टक्के केंद्रीय पुरस्कृत) (१०० टक्के केंद्र हिस्सा) १३ कार्यालयीन खर्च , १७ संगणक खर्च या अंतर्गत उपलब्ध असणा-या/उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीतून भागविण्यात यावा. तसेच उर्वरित १२ प्रकारच्या नकाशांचे डिजीटायझेशन करण्याकरिता होणारा खर्च, मूळ भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन करण्यासाठीच्या ई-नकाशा कार्यक्रमासाठी राज्य शासनाचे १०० % पूरक अनुदान, महसूल व वन विभाग मागणी क्र.: सी § १, प्रधान लेखाशिर्ष : २०२९ जमीन महसूल, (००)(१०२) सर्वेक्षण व जमाबंदीचे कामे (००) (११) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) डिजीटायझेशन (२०२९०८८८) यामधून भागविण्यात यावा.

४) या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील. सदर निधीच्या विनियोजनासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी. प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावेत.

हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२४/२०१६/व्यय-१०, दि. १६/०७/२०१६ तसेच मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. २७/१/२०१७ रोजी झालेल्या १०९ व्या बैठकीचे इतिवृत्त अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०३३११३२९३६३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.03.31 22:40:27 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**

शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त

९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.सर्व उपसंचालक भूमि अभिलेख,
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१४.कोषागार अधिकारी, पुणे
१५.माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.नियोजन विभाग, का.क्र. १४७५, मंत्रालय, मुंबई
१७.वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६/कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती ल-१.